कार्यकारी अभियंता (स्थापत्य) यांच्या
बदल्या व नियुक्त्या.

# महाराष्ट्र शासन
# जलसंपदा विभाग
## शासन आदेश क्रमांकः एलटीएस-१११८/(२००/२०१८)/आ (वर्ग-१)

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक: ३० जून, २०१८.

**शासन आदेश :-**

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन अधिनियम, २००५ मधील तरतुदीनुसार व सक्षम प्राधिकरणाच्या मान्यतेने जलसंपदा विभागातील कार्यकारी अभियंता (स्थापत्य) या संवर्गातील अधिकाऱ्याच्या बदलीने नियुक्त्या / पदस्थापनेत बदल खाली दर्शविल्याप्रमाणे करण्यात येत आहेत:-

| अ.क्र. | अधिकाऱ्यांचे नाव | सध्या धारण करीत असलेले पद | बदलीने नियुक्तीचे पद | अभिप्राय |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १. | श्री.सुनिल सुधाकर संगावार | कार्यकारी अभियंता, धरण सुरक्षितता संघटना विभाग क्र. २, नाशिक. | सहायक मुख्य अभियंता (१), मुख्य अभियंता,जलसंपदा विभाग, अमरावती. | बदली अधिनियमातील कलम ४(५) नुसार श्री.न.कि.तायडे यांच्या बदलीमुळे रिक्त झालेल्या पदी. (विनंतीनुसार) |
| २. | श्री.अ.ल.नाडे | कार्यकारी अभियंता, कण्हेर कालवा विभाग क्र. २, करवडी, कराड. | कार्यकारी अभियंता, राजस्तरीय तांत्रिक सल्लागार समिती, कक्ष-२ (SLTAC-II), पुणे. | बदली अधिनियमातील कलम ४(५) नुसार रिक्त पदी. (विनंतीनुसार) |
| ३. | श्री. शशीकांत शरणाप्पा गायकवाड | कार्यकारी अभियंता, उरमोडी धरण विभाग, सातारा. | कार्यकारी अभियंता, कण्हेर कालवा विभाग क्र. २, करवडी, कराड. | बदली अधिनियमातील कलम ४(५) नुसार श्री.अ.ल.नाडे यांच्या बदलीमुळे रिक्त होणाऱ्या पदी. (विनंतीनुसार) |

२. सदर नियुक्ती/पदस्थापना दिलेल्या अधिका-यास आपल्या नवीन नियुक्तीच्या जागी हजर होण्यास तात्काळ कार्यमुक्त करावे.

तसेच, संबंधीत अधिकाऱ्यास नवीन नियुक्तीच्या जागी हजर होण्यासाठी कोणत्या दिनांकास कार्यमुक्त केले आणि ते नवीन नियुक्तीच्या जागी कोणत्या दिनांकास हजर झाले याबाबत शासनास doesttclass1.wrd@maharashtra.gov.in या ई-मेल संकेतस्थळावर त्वरित कळवावे.

३. संबंधीत अधिकाऱ्यास शासनाच्या पूर्वपरवानगीशिवाय कोणत्याही कारणास्तव रजा मंजूर करु नये. तसेच म.ना.से. (रजा) नियम, १९८१ मधील नियम-३० (सी) नुसार मूळ कार्यालयाने बदली झालेल्या अधिकाऱ्याचे कोणत्याही प्रकारचे रजेचे अर्ज स्विकारु नयेत. असे अर्ज प्राप्त झाल्यास, ते संबंधीत

अधिकाऱ्यास मूळ पत्त्यावर नोंदणी पोच देय डाकेने परत करावेत. मूळ कार्यालयाकडे बदली झालेल्या अधिकाऱ्याचे रजेचे अर्ज पाठविल्यास सदर अर्जांची दखल घेण्यात येणार नाही.

४. सदरहू बदली आदेशानुसार तात्काळ नियुक्तीच्या ठिकाणी हजर न झाल्यास वा कोणत्याही प्रकारचा दबाव आणून बदली रद्द करण्याचा प्रयत्न झाल्यास, ही कृती महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक) नियम १९७९ मधील नियम २३ चे उल्लंघन करणारी असल्यामुळे, ती गैरवर्तणूक समजून त्यांचे विरुध्द शिस्तभंगविषयक कारवाई करण्यात येईल, याची संबंधितांनी नोंद घ्यावी.

५. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०६३०१५२२०५७३२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sunil Gangaram Gangarkar

Digitally signed by Sunil Gangaram Gangarkar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8b2512fdfec4104829bc2f439e33adb2e3f823a285cfade8149e690564bc13f6, cn=Sunil Gangaram Gangarkar
Date: 2018.06.30 15:31:55 +05'30'

**( सु.गं.गांगरकर )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. प्रधान सचिव (जलसंपदा)/ सचिव (जलसंपदा व्यवस्थापन व लाक्षेवि) / सचिव (प्रकल्प समन्वय), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
२. सर्व कार्यकारी संचालक / महासंचालक, जलसंपदा विभाग.
३. सर्व मुख्य अभियंता व सहसचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई .
४. सर्व मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग.
५. महालेखापाल, महाराष्ट्र (लेखा व अनुज्ञेयता), १-मुंबई / २-नागपूर.
६. सर्व अधीक्षक अभियंता (स्थापत्य), जलसंपदा विभाग.
७. खाजगी सचिव, मा. मंत्री (जलसंपदा), मंत्रालय, मुंबई.
८. खाजगी सचिव, मा. राज्यमंत्री (जलसंपदा),मंत्रालय, मुंबई.
९. संबंधीत अधिकारी.
१०. संबंधीत जिल्हा कोषागार अधिकारी.
११. सर्व कार्यासने जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई .
१२. कार्यासन आ (वर्ग-१), संग्रहार्थ.